राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत ठाणे महानगरपालिका हद्दीतील दिवा तलावास तत्वत:मान्यता व निधी वितरित करण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०२४/प्र.क्र.७०/आस्थापना (अ)**
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २०२४.

**वाचा :-** १) पर्यावरण विभाग विभाग शासन निर्णय क्र.इएनव्ही २००८/प्र.क्र.६९/तां.क.३, दि.२७.०८.२००८
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. कोल्हापूर यांचे दि.०५.०१.२०२४ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त प्रस्ताव.
३) सुकाणू समितीच्या दिनांक ३०.०१.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना –**

राज्यातील तलाव, सरोवरे व मोठे जलाशय यांचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी राज्य शासनाने राज्य योजनेंतर्गत राज्य सरोवर संवर्धन योजना सन २००६-०७ या आर्थिक वर्षापासून सुरु केली आहे. या योजनेंतर्गत सर्वसाधारणपणे खालील कामांचा समावेश होतो.

१.तलावाच्या पाण्याचे प्रदूषण करणारे स्त्रोत निश्चित करुन प्रदुषण रोखण्यासाठी उपाययोजना करणे.
२.तलावात साचलेला आवश्यक घातक व ऑरगॅनीक गाळ काढणे.
३.तलावाची गुणवत्ता टिकविण्यासाठी,
अ. तलावातील अनावश्यक व उपद्रवी वनस्पती नष्ट करुन त्यांची वाढ नियंत्रणात आणण्यासाठी उपाययोजना करणे.
ब. तलावातील जैविक प्रक्रियेव्दारे तलावातील पाण्याची गुणवत्ता सुधारणे.
क. किनारा सौंदर्यीकरण, हरित पटटा विकसित करणे, कुंपण घालणे, मनोरंजनासाठी बालोद्यान, नौकाविहार, कमी किंमतीची स्वच्छतागृहे इ.
४.जनसहभाग व जनजागृतीसाठी कार्यक्रम तसेच प्रदुषण रोखण्यासाठी स्थानिक परिस्थितीनुसार करावयाच्या उपाययोजना.

या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक अधिक्षक अभियंता, सार्वजिनिक बांधकाम विभाग, ठाणे महानगरपालिका यांच्यामार्फत सादर **ठाणे महानगरपालिका हद्दीतील दिवा तलावाच्या प्रस्तावास तत्वत: मान्यता व त्यानुषंगिक निधी मुक्त करण्याची बाब** शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत आर्थिक अधिक्षक अभियंता, सार्वजिनिक बांधकाम विभाग, ठाणे महानगरपालिका यांच्यामार्फत सादर दिवा तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धनाच्या प्रस्तावावर सुकाणू समितीच्या दि.३१.०१.२०२४ रोजीच्या बैठकीत चर्चा करण्यात आली व सदर बैठकीच्या इतिवृत्तातील

निर्णयाच्या अधीन राहून **रुपये ३,९८,७७,०००/-(रुपये तीन कोटी अठ्याण्णव लक्ष सत्त्याहत्तर हजार फक्त) मर्यादेत तत्वत: मान्यता देण्यात येत आहे. सदरपैकी प्रथम हप्त्यापोटी रु. १,९८,००,०००/- (रुपये एक कोटी अठ्याण्णव लक्ष फक्त) इतका निधी आयुक्त, ठाणे महानगरपालिका, जिल्हा ठाणे यांना वितरित/मुक्त करण्यास या शासन निर्णयाद्वारे खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.**

- राज्य सरोवर संवर्धन योजनेच्या दि.२७.०८.२००८ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सुचनांनुसार विहित नमून्यातील सविस्तर प्रकल्प अहवाल सादर करावा. सदर प्रस्तावासोबत तलावाच्या मालकी हक्काबाबत माहिती (सात- बारा कागदपत्राची प्रत), तलावातील पाण्याचा सद्यस्थितीतील जलगुणवत्ता अहवाल, स्थानिक संस्थेचा हिस्सा जमा करण्याबाबतचा ठराव व तलाव संवर्धनाचे काम पूर्ण झाल्यावर त्याची देखभाल दुरुस्तीबाबत ठराव सादर करावे.

- प्रस्तावित कामांमध्ये वनीकरणाचा समावेश करण्यात यावा. वनीकरण (Tree plantation/ Afforestation) करतांना स्थानिक झाडांच्या लागवडीसह शासनाचे विविध अभियान/ उपक्रम यांचे उद्दिष्ट्ये साध्य होतील-जसे Bomboo Mission, Miyawaki Plantation अशा पद्धतीने वनीकरण करण्यास प्राधान्य देण्यात यावे. तसेच जमिनीची धूप रोखण्यासाठी आणि काही प्रमाणात नैसर्गिकरित्या जलशुद्धीकरणासाठी वाळा)Vetiver(, कर्दळी)Canna(, शेवगा )Moringa .इ ( स्वरूपाच्या वनस्पतीची लागवड समावेश करण्यात यावा.

उपरोक्त नुसार तलाव संबंधित सविस्तर प्रकल्प अहवाल विभागास तातडीने सादर करावा. त्यानुषंगाने प्रशासकीय मान्यतेसह अंतिम मान्यता देण्याची कार्यवाही शासन स्तरावर करण्यात येईल.

२. या शासन निर्णयान्वये वितरित केलेला निधी, प्रस्तावास प्रशासकीय मान्यतेसह अंतिम मान्यता प्राप्त झाल्यानंतरच खर्ची करण्याची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. कोल्हापूर, जि. कोल्हापूर यांनी घ्यावी.

३. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा “मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०२), पर्यावरण प्रतिबंध, (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)” या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

४. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, जिल्हा ठाणे यांना प्रथम हप्त्यापोटी अदा करावयाची **रुपये १,९८,००,०००/- (रुपये एक कोटी अठ्याण्णव लक्ष फक्त)** एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून आयुक्त, ठाणे महानगरपालिका, जिल्हा ठाणे यांना अदा करण्यासाठी श्री. किशोर मो. सोईतकर, कार्यासन अधिकारी, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. सु.कि. निकम, सहसचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय यांना नियंत्रक अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, जिल्हा ठाणे यांना

**रुपये १,९८,००,०००/- (रुपये एक कोटी अठ्याण्णव लक्ष फक्त)** अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाद्वारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. **प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्रक्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये** प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच त्यातील अटी व शर्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. प्रमाणित करण्यात येते की, सदर दिनांक १२ एप्रिल, २०२३ रोजीच्या शासन निर्णयाच्या परिशिष्टातील अनु.क्र. २ व ९ मधील अटींची पुर्तता होत आहे.

I) वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यास विभागाला अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

II) वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,३,४,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की ही योजना केंद्र पुरस्कृत बाहय सहाय्यित योजना नाही.

III) वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक १,२,३ व ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही.

६. या शिवाय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१६/प्र. क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १०.०५.२०१६ अन्वये अनुक्रमांक “अ” मधील खालील बाबींची पूर्तता होत आहे.

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकाराबाबत वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र अर्थंस २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक ०२.०४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ (अ) नुसार रु.५ कोटी पर्यंतच्या अनावर्ती योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत.

**२) दिवा तलावाच्या संवर्धनासाठी रु. १,९८,००,०००/- (रुपये एक कोटी अठ्याण्णव लक्ष फक्त) इतका निधी प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे वितरित करण्यात येत आहे. सदरनुसार देण्यात येणारे अनुदान सशर्त आहे. त्यानुसार सदर वितरित केलेला निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र विभागास सादर केल्यानंतर निधीचा पुढील हप्ता वितरित करण्याच्या शर्तीसह वितरित करण्यात येत आहे.**

३) “मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदुषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)”या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४) आयुक्त, ठाणे महानगरपालिका, जिल्हा ठाणे यांच्याकडून पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

५) तसेच उपरोक्त शासन निर्णयाच्या अनुक्रमांक “अ” मधील क्रमांक ६,७,८ व ९ येथील बाबी लागू नाहीत.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या संमतीने अनौपचारिक संदर्भ क्र.७५/का.१४७२, दि.२३.०२.२०२४ व वित्त विभागाच्या संमतीने, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.७५/२०२४/व्यय-१६, दि.१२.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१४४१०९१३०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.03.13 14:50:10 +05'30'

**(सु. कि. निकम ) ,**
**सह सचिव ,पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) १. महाराष्ट्र मुंबई-४०००२०.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई- ४०००२०.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा) २. महाराष्ट्र, नागपूर.
१३. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१५. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
१६. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
१७. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई.
१८. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१९. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
२०. रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवडनस्ती.